**विशेष प्रसिद्धी मोहिमेंतर्गत रेडिओ वाहिन्यांवर प्रसारीत करण्यात आलेल्या जाहिरातीच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक कौविउ-२०१६/प्र.क्र.१५६ -२/अभियान-१**
२ रा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३१ मार्च, २०१७.

वाचा : १) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७/०४/२०१५.
२) मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव यांचे पत्र क्रमांक प्रद.वि.प्र.मो./२०१६/का-६/ १३७, दिनांक ३०/०९/२०१६.
३) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग पत्र क्रमांक कौविउवि-२०१५/प्र.क्र. १५६/अभियान-१, दिनांक ०७/१०/२०१६.
४) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग ज्ञापन क्रमांक कौविउवि-२०१६/ प्र.क्र.१११/अभियान-१, दिनांक ०१/०३/२०१७.

**प्रस्तावना :**

राज्य शासनाच्या वतीने माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत विविध प्रसिध्दी माध्यमांद्वारा विशेष प्रसिध्दी मोहिम राबविण्यात आली होती. त्यानुसार राज्यातील रेडिओ चॅनल्स, बेस्ट बसेसमध्ये एल.ई.डी.स्क्रीन जाहिरात, बेस्ट बसेसच्या साईड व बॅक पॅनलवरील जाहिरात तसेच एस.टी. स्थानकांवर एल.ई.डी.स्क्रिनद्वारे जाहिरात प्रसारित करण्याची कार्यवाही करण्यात आलेली आहे. त्या अनुषंगाने राज्यातील रेडिओ वाहिन्यांवर या विभागाच्या विविध योजनांबाबत प्रसारित करण्यात आलेल्या जाहिरातीच्या देयकांची पूर्तता सन २०१६-१७ या आर्थिक वर्षातील मंजूर अनुदानातून करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

राज्य शासनाच्या वतीने राबविण्यात आलेल्या विशेष प्रसिध्दी मोहिमअंतर्गत दिनांक १३/१०/२०१६ ते दिनांक १७/१०/२०१६ व दिनांक २८/१२/२०१६ ते दिनांक ०५/०१/२०१७ या कालावधीत कौशल्य विकास व उद्योजकता विभागाच्या विविध योजनांबाबत रेडिओ वाहिन्यांवर प्रसारित करण्यात आलेल्या जाहिरातीची खालील देयके अदा करण्याकरिता येणाऱ्या **रुपये ८२,७१,८१३/- (रुपये ब्याऐंशी लाख एकाहत्तर हजार आठशे तेरा फक्त)** इतक्या खर्चास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | रेडिओ वाहिनी | देयक क्रमांक व दिनांक | देयकाची रक्कम (रुपये) |
|---|---|---|---|
| १ | रेडिओ ब्रॉडकास्ट लिमि., मुंबई-५१. (९१.१ FM Radio City) | १) क्र.१८१६०२०९५२, दिनांक ३१/१२/२०१६ | ५,६०,६२५/- |
| | | २) क्र.१८१६०२२२०३, दिनांक १५/०१/२०१७ | ५,६०,६२५/- |
| २ | डिजिटल रेडिओ (मुंबई) ब्रॉडकास्टींग लिमि., मुंबई-१३. (RED FM ९३.५) | १) क्र.२०५०४०१०९२/२०१६/१०, दिनांक ३१/१०/२०१६ | १६,५६०/- |
| | | २) क्र.२०२०५१२०१०/२०१६/१०, दिनांक ३१/१०/२०१६ | ३५,१९०/- |
| | | ३) क्र. २०२०५१६६०९, दिनांक ३१/१२/२०१६ | १,६५,२२७/- |
| | | ४) क्र.२०५०४०१६२५, दिनांक ३१/१२/२०१६ | २,०५,९०६/- |
| | | ५) क्र. २०२०५१८८३५, दिनांक ३१/०१/२०१७ | २,०१,९४५/- |
| | | ६) क्र. २०५०४०१८७७, दिनांक ३१/०१/२०१७ | ३,३३,४९०/- |
| ३ | नेक्स्ट रेडिओ लिमि., मुंबई-१३. (९४.३ RADIO ONE) | १) क्र.६१३८, दिनांक ३१/१२/२०१६ | १,४२,५२७/- |
| | | २) क्र.६३००, दिनांक १५/०१/२०१७ | २,१३,७९१/- |
| ४ | एंटरटेनमेंट नेटवर्क (इंडिया) लिमि., मुंबई-१३. (९८.३ RADIO MIRCHI) | १) क्र.३८१२१२, दिनांक ३१/१०/२०१६ | ५,७९,६००/- |
| | | २) क्र.३८७८०५, दिनांक ३१/१२/२०१७ | ७,०८,९३४/- |
| | | ३) क्र.३८९७५१, दिनांक १५/०१/२०१७ | ७,५३,१९४/- |
| ५ | धमाल २४ रेडिओ नेटवर्क लिमि., नोएडा, उत्तर प्रदेश. (१०६.४ FM RADIO DHAMAAL२४) | १) क्र.BIL/२०१६१७/१०/०२७, दिनांक १२/१०/२०१६ | २,२०८/- |
| | | २) क्र. BIL/२०१६१७/१०/०५७, दिनांक १२/१०/२०१६ | २,२०८/- |
| | | ३) क्र. BIL/२०१६१७/१०/१३६, दिनांक १२/१०/२०१६ | २,२०८/- |
| | | ३) क्र. BIL/२०१६१७/१०/२६१, दिनांक १२/१०/२०१६ | ३,३१२/- |
| | | ४) क्र. BIL/२०१६१७/१०/२९७, दिनांक १२/१०/२०१६ | ३,३१२/- |
| | | ५) क्र. BIL/२०१६१७/१०/४१५, दिनांक १२/१०/२०१६ | ३,३१२/- |
| ६ | डीबी कॉर्प लिमिटेड, जयपूर, राजस्थान. (MY FM) | क्र.१६१००७७६, दिनांक १२/१०/२०१६ | ४,४१६/- |

| **अ. क्र.** | **रेडिओ वाहिनी** | **देयक क्रमांक व दिनांक** | **देयकाची रक्कम (रुपये)** |
|---|---|---|---|
| ७ | गोल्डमाईन ॲडव्हरटायझिंग, लिमि., मुंबई-५७. (रेडिओ स्पॉट निर्मिती) | क्र.HD००१९७०, दिनांक ३१/१०/२०१६ | ५,७५,०००/- |
| ८ | प्रसार भारती, आकाशवाणी, मुंबई-२०. (Spot evening mid break during news) | १) क्र.३३/MUMPCSHUST१४९A/OCTOBER, २०१६, दिनांक ऑक्टोबर, २०१६ | ५,३६,७६५/- |
| | | २) क्र.३२/MUMPCSHUST१४९/OCTOBER, २०१६, दिनांक ऑक्टोबर, २०१६ | ३,३५,४७८/- |
| | | ३) क्र.४६/MUMPCSHU२४७/JANUARY, २०१७, दिनांक जानेवारी, २०१७ | ५,८१,४९५/- |
| | | ४) क्र.४७/MUMPCSHU२४७A/JANUARY, २०१७, दिनांक जानेवारी, २०१७ | ५,८१,४९५/- |
| | | ५) क्र.४८/MUMPCSHU२४७B/JANUARY, २०१७, दिनांक जानेवारी, २०१७ | ५,८१,४९५/- |
| | | ६) क्र.४९/MUMPCSHU२४७C/JANUARY, २०१७, दिनांक जानेवारी, २०१७ | ५,८१,४९५/- |
| | **एकूण** | | **८२,७१,८१३/-** |

२. प्रमाणित करण्यात येते की, सदरहू खर्च सन २०१६-१७ या आर्थिक वर्षामध्ये यापूर्वी करण्यात आलेला नाही.

३. या बाबींवर होणारा खर्च सन २०१६-१७ या आर्थिक वर्षामध्ये प्रमोद महाजन कौशल्य व उद्योजकता विकास अभियानांतर्गत मागणी क्रमांक झेडए-१, २२३० कामगार व सेवायोजन, (०१) (०८) प्रमोद महाजन कौशल्य व उद्योजकता विकास अभियान (२२३०६११८) या लेखाशिर्षाखाली मंजूर अर्थसंकल्पिय तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. राज्यात कौशल्य विकास कार्यक्रमाचे प्रभावी नियोजन व अंमलबजावणी करण्यासाठी सोसायटी नोंदणी अधिनियम, १८६० अन्वये महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटीची स्थापना करण्यात आली आहे. तसेच सदर अभियानाकरिता आवश्यक निधी कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालयाच्या आहरण व संवितरण अधिकाऱ्यांमार्फत ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या उप लेखाशिर्षांतर्गत उपलब्ध करुन देण्यात येतो. त्यानुसार विभागाकडून सदर लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पित झालेल्या निधीच्या ८०% निधी कौशल्य विकास प्रशिक्षणाच्या कार्यक्रमाकरिता वापरण्याच्या दृष्टीने सदर लेखाशिर्षाखालील तपशिलवार उपशिर्षामधील निधी पुनर्विनियोजनाद्वारे ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) यामध्ये पुनर्विनियोजनाने वळता करुन महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटीस उपलब्ध करुन देण्याची कार्यवाही करण्यात आलेली आहे. त्यानुसार २६-जाहिरात व

प्रसिध्दी व इतर उपलेखाशिर्षाखालील ८०% उपलब्ध निधी ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) यामध्ये पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध करुन देण्यासाठी विभागाने दिनांक ०१/०३/२०१७ रोजी ज्ञापन निर्गमित केले आहे.

५. त्यानुसार उपरोक्त विशेष प्रसिद्धी मोहिमेंतर्गत आलेल्या रुपये ८२,७१,८१३/- (रुपये ब्याऐंशी लाख एकाहत्तर हजार आठशे तेरा फक्त) इतक्या खर्चाच्या देयकांची पूर्तता मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी हे संबंधितांना विहित मार्गाने करतील.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या उपरोक्त संदर्भाधीन क्रमांक १ येथील दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये निर्गमित केलेल्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-दोन, अ.क्र.८, नियम क्रमांक १७ अनुसार जाहिरातींवरील खर्च करण्यास प्रशासनिक विभागास असलेल्या वित्तीय अधिकारांना वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३११८२८२७८६०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

S.G. Patil

Digitally signed by S.G. Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SDED, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f64f9296da4ba15d02d3ad3826a21a74ed08035 5ac04eef5617c3b4f08af47ae, cn=S.G. Patil
Date: 2017.03.31 18:30:35 +05'30'

**(सं.गि.पाटील)**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
२. उप सचिव, रोस्वरो-२, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई,
३. कक्ष अधिकारी, व्यय-६, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
४. आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालय, कोकण भवन, नवी मुंबई,
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी, कफ परेड, मुंबई,
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
७. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
९. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, ठाणे,
१०. अपर कोषागार अधिकारी, उप कोषागार कार्यालय, कोकण भवन, नवी मुंबई,
११. निवासी व लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१२. निवड नस्ती.